**महाराष्ट्र राज्यातील सत्र न्यायालयातील विधि व न्याय विभागामार्फत नियुक्त विधि अधिकारी आणि गृह विभागामार्फत पदोन्नत अतिरिक्त सरकारी अभियोक्ता यांच्यातील कामकाज वाटपाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन आदेश क्रमांक : डीपीपी-२०२१/अ.सं.७२/का.१४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २९ ऑक्टोबर, २०२१.

**संदर्भ:-** १) गृह विभाग शासन निर्णय क्र. एसपीपी-१०९९/प्र.क्र.१५४/पोल-१०, दि.१० जानेवारी, २०२१
२) विधि व न्याय विभागाचे पत्र क्र. एमआयएस-१००६/(२९५)/कार्या.१४, दि.२५ फेब्रुवारी, २००७
३) गृह विभाग शासन आदेश क्र. डीपीपी-१०१८/प्र.क्र.३४७/पोल-१०, दि.३१ डिसेंबर, २०२०
४) गृह विभाग शासन आदेश क्र. डीपीपी-०७२१/प्र.क्र.१६६(भाग-२)/पोल-१०, दि.०५ ऑगस्ट, २०२१

## शासन आदेश

ज्याअर्थी, गृह विभागाने मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी रिट याचिका क्र. ५००५/१९९९ मध्ये दि.२५.०७.२०१७ रोजीच्या आदेशाची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने दि.३१.१२.२०२० व दि.०५.०८.२०२१ रोजीच्या शासन आदेशान्वये “अतिरिक्त सरकारी अभियोक्ता” या पदावर २४० सहायक सरकारी अभियोक्त्यांना पदोन्नती दिली आहे.

२ त्याअर्थी, महाराष्ट्र राज्यातील सत्र न्यायालयात विधि व न्याय विभागामार्फत नियुक्त सरकारी अभियोक्ते यांना निर्देश देण्यात येतात की, त्यांनी सत्र न्यायालयातील फौजदारी प्रकरणांचे वाटप गृह विभागामार्फत पदोन्नत अतिरिक्त सरकारी अभियोक्ता आणि विधि व न्याय विभागामार्फत कंत्राटी पद्धतीने नियुक्त असलेले विधि अधिकारी यांच्यात समसमान प्रमाणात करावेत.

विशेष न्यायालयातील (पोक्सो कायदा, ॲट्रॉसिटी कायदा, मोक्का कायदा, एम.पी.आय.डी. कायदा इ.) प्रकरणांसाठी अभियोग चालविण्यास गृह विभागाने अभियोक्त्यांना नामनिर्देशित करेपर्यंत विधि व न्याय विभागामार्फत नामनिर्देशित अतिरिक्त सरकारी अभियोक्ता कामकाज चालवतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२९१८३०११९०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

PRAVIN ARUN
KUMBHOJKAR

Digitally signed by PRAVIN ARUN KUMBHOJKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=87a3595a52aa9c93dd11cf6d08eb9c32c251f94716de23ff63e49022fdaff41f, pseudonym=6A79AD3FDF52C35863D0C4816D76B8E9A827102D, serialNumber=27C674EF79FE187EBCDF4FA9C80062ECA97A210FB0D7B7554B8FA6D755925AD1, cn=PRAVIN ARUN KUMBHOJKAR
Date: 2021.10.29 18:58:43 +05'30'

**(प्रविण अ. कुंभोजकर)**
**उप विधि सल्लागार-नि-उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,

२) मा.महाधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

३) अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,

४) अपर मुख्य सचिव (अ. व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,

५) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

६) सह सचिव, विधि व न्याय विभाग, नागपूर,

७) सह सचिव, विधि व न्याय विभाग, औरंगाबाद,

८) सर्व जिल्हा सरकारी वकील व सरकारी अभियोक्ता, सरकारी वकील यांचे कार्यालय, जिल्हा व सत्र न्यायालय,

९) निवडनस्ती.